नवीन बांबू धोरणाची अंमलबजावणी करिता चिचपल्ली जि. चंद्रपूर येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएसटी-२०१३/प्र.क्र.६४/भाग-३/फ-९**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: १२ फेब्रुवारी, २०१५**

**वाचा**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. इएसटी-२०१३/प्र.क्र. ६४/भाग-२/फ-९, दिनांक ४.१२.२०१४.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.५७ (१३-१४)/१७९३/२०१४- १५, दिनांक २८.१.२०१५

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ३१.१.२०१५

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ९.२.२०१५

**प्रस्तावना**

बांबू धोरणाची व्यापक अंमलबजावणी करण्याकरिता शास्त्रोक्त पध्दतीने बांबू लागवड व औद्योगिक वापरासाठी व प्रसार करण्यासाठी चिचपल्ली, जि. चंद्रपूर येथे संशोधन व प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ४.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या प्रशिक्षण केंद्राच्या इमारतीच्या बांधकामाच्या अनुषंगाने व इतर बाबीस अनुसरुन रू.११.१२ कोटी पैकी प्राथमिक कामाकरीता रू. १.०० कोटी निधी उपलब्ध करून देण्याच्या पुरवणी मागणी प्रस्तावास वित्त विभागाने मान्यता देण्यात आली आहे. या मान्यतेस अनुसरुन निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

बांबू धोरणाची व्यापक अंमलबजावणी करण्याकरिता शास्त्रोक्त पध्दतीने बांबू लागवड व औद्योगिक वापरासाठी व प्रसार करण्यासाठी चिचपल्ली, जि. चंद्रपूर येथे संशोधन व प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्यासाठी रू.७५.०० लाख अर्थसंकल्पीय तरतुद विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर तरतूद १०१ (११) वनसंरक्षण, विकास पुर्ननिर्मिती-पंचवार्षिक योजनेतंर्गत योजना, राज्य योजनेअंतर्गत योजना (११) (१०) ग्राम विकास व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखा शिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून खर्च भागविण्यात यावा.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ९.२.२०१५ च्या परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१४४६१३६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.13 14:55:11 +05'30'

**( डॉ.यु.एम.फारुकी )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ट वनोपज, सनियंत्रण व मुल्यांकन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
६. विभागीय वन अधिकारी, चंद्रपूर.
७. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा, लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
८. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
९. नियोजन विभाग (कार्यासन-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
१०. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (निवडनस्ती)